परिभाषित अशंदान निवृत्तीवेतन/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजने अंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत
दिवंगत.डॉ.उसमानखान वजीरखान पठाण, वैद्यकीय अधिकारी, गट अ

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः** अंनियो २०२०/प्र.क्र.५३/सेवा-३
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ०६ जानेवारी,२०२२

वाचा -

१) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९.०९.२०१८
२) सहसंचालक (अ व प्र) आरोग्य सेवा,आयुक्तालय,मुंबई यांचे पत्र क्र/संआसे.२ब/डॉ.पठाण/अं.नि.वेतन/ जा.क्र.४४/२० दिनाकं १४.०९.२०२०
३) श्रीमती सायली विजय कोल्हटकर यांचा दि.२०.०३.२०१९ रोजीचा अर्ज

**शासन आदेश :**

उपरोक्त वाचा क्र.२ अन्वये सहसंचालक (अ व प्र) आरोग्य सेवा,आयुक्तालय,मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती सायली विजय कोल्हटकर यांच्या उपरोक्त वाचा क्र.३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना वाचा क्र.१ येथील वित्त विभाग शासन निर्णय क्र अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार दिवंगत. डॉ.उस्मानखान वजीरखान पठाण, वैद्यकीय अधिकारी, गट-अ यांच्या नामनिर्देशित व्यक्ती / कायदेशीर वारसास म्हणजे त्यांच्या पत्नीस श्रीमती सायली विजय कोल्हटकर यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

सदर “सानुग्रह अनुदान” शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्षे शासन सेवा होण्यापूर्वी दि.२५.०९.२०१६ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्ष कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदरचा खर्च मागणी क्र. जी-६-२०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी १०३ अनुकंपा भत्ते (००)(०६)-परिभाषित अंशदान /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरचा शासन आदेश वरील वाचा क्र १.येथील शासन निर्णयातील अ.क्र.५ येथे नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२९१६४५२७१९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE
VIJAYKUMAR
LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.23 12:21:12 +05'30'

**(वि.ल.लहाने)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त तथा अभियान संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई
२) संचालक आरोग्य सेवा,आयुक्तालय,मुंबई
३) उपसंचालक आरोग्य सेवा,पुणे मंडळ,पुणे
४) संबंधित अधिदान व लेखा अधिकारी  कोषागार अधिकारी/
५) जिल्हा शल्यचिकित्सक ,सामान्य रुग्णालय ,सातारा
६) श्रीमती सायली विजय कोल्हटकर, ३०७,मंगळवार पेठ, सातारा-४१५००२ ,यांना माहितीस्तव
७) निवड नस्ती -सेवा/३